3/45

# अबूचा पहाड.



किंमत २ आणे.

पुस्तकें मिळण्याचा पत्ता:—
विविधज्ञानविस्तार ऑफिस मुंबई नं. २

रजिस्टर ता. १५ आक्टोबर १९१५
रजिष्टर नं. १८ अ
डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रॅन्स्लेशन सोसाइटी पुणे. १८९४.
DECCAN VERNACULAR TRANSLATION SOCIETY POONA. 1894.

# अबूचा पहाड.

लेखकः

**गणेश रघुनाथ अभ्यंकर,**
बी. ए., एल् एल्. बी.,
वकील, सांगली.



श्रीलक्ष्मीनारायण छापखाना,
४०२, ठाकुरद्वार, मुंबई.

जून १९१५.

( विविधज्ञानविस्तार-पुस्तकालयांत विकत मिळेल. )

किंमत दोन आणे.

क ३/८४

# प्रकाशकाची प्रस्तावना.



मराठी भाषेंत स्थलवर्णनात्मक पुस्तकें फार कमी आहेत. त्यांत प्रस्तुत पुस्तकानें भर पडेल अशी आशा आहे.

मूळ हा निबंध विविधज्ञानविस्तारांत १९०७सालीं प्रसिद्ध झाला. महाराष्ट्रांत ज्याप्रमाणें माथेरान, महाबळेश्वर, त्याप्रमाणें "अबूचा पहाड" हें स्थळ राजपुताना गुजराथ प्रांतांत हवेसाठीं प्रसिद्ध आहे. शिवाय येथें सुंदर प्रेक्षणीय जैन मंदिरें असल्यामुळें, जैनांसच नव्हे पण जैनांशिवाय इतर लोकांसही हें स्थळ दर्शनीय झालें आहे.

पुस्तकांत वर्णन केलेल्या ठिकाणांची नीट माहिती होण्यास या पुस्तकास जोडलेल्या नकाशाचा आणि नकाशांतील माहितीच्या टीपांचा चांगला उपयोग होईल अशी आशा आहे.

# नकाशांतील माहितीच्या टीपा.

## विमलशहाचें देवालय.

१. हत्तीखाना. येथेंच विमलशहाचा घोड्यावर बसलेला पुतळा उभा आहे.

२. देवडी.

३. संगमरवरी अष्टकोनाकृति मंडप.

४. आदिनाथाचे देवालयापुढील भाग.

५. आदिनाथाची मूर्ति बसविलेला गाभारा.

६. अंबाभवानीची मूर्ति बसविलेली जागा. **अ ब ड इ क**–हा देवळासभोंवतीचा संगमरवरी चौक आहे.

**अ ब व ड**–या दुधई चौकाच्या भागांत तीर्थंकरांच्या सुमारें ५२ कमानी असून त्यांत संगमरवरी सिंहासनावर पुष्कळ तीर्थंकरांच्या मूर्ति बसवलेल्या आहेत.

## वस्तुपाल व तेजपाल यांचें देवालय.

७. या ठिकाणीं हत्तीखाना आहे.

८. या ठिकाणीं नेमिनाथाची मूर्ति असलेला गाभारा आहे.

९. नेमिनाथाच्या देवळापुढील सोपा. याचे पुढेंच संगमरवरी मंडप आहे. **गध, गप, फब, बभ**–हा नेमिनाथाच्या देवळासभोंवतीचा संगमरवरी चौक आहे व यांत सुमारें ३९ तीर्थंकरांच्या कमानी आहेत.

पुढील वर्णनांत, क्यापटन लॉर्ड यांचें दिलतारा मंदिराचें त्रोटक पुस्तक, रॉयल एशियाटिक सोसायटीच्या मासिकांतील लेख, व टॉड यांचा राजस्थानावरील ग्रंथ, यांचा पुष्कळ उपयोग झाला आहे.

लेखक.



# अबूचा पहाड.

## [ स्थलवर्णन. ]

"Beyond controversy this is the most
b of all the temples of India, and there
an edifice besides the Taj Mahal
can approach to it. The pen is
npetent to describe the exuberant
ies of this proud monument of the
raised by one of the richest of their
ies."

*Col. Tod.*

ई इलाख्याच्या उत्तरेस अगदीं टोंकावर, शिरोही
ांत, अरवलीच्या पश्चिमेस सुमारें सात मैलांवर,
च्या रांगांसमोर हा पर्वत आहे. याचा आकार लांब
ोळा असून याची लांबी पायथ्याशीं २० मैल
घाटमाथ्यावर १४ मैल आहे, व रुंदी २ मैल
याची दिशा ईशान्य–नैर्ऋत्य अशी आहे. हा

पहाड फार प्राचीन असावा, असें याच्या स्वरूपावरून दिसतें. या डोंगराचे दगड वर्तुळाकार असून गुळगुळीत झालेले आहेत. यावरून पुष्कळ कालपर्यंत वारा व पाऊस इत्यादि पंचमहाभूतांच्या परिणामानें त्यास ही स्थिति प्राप्त झाली असावी, असें भूगर्भशास्त्रवेत्त्यांचें मत आहे. या पहाडाची उंची समुद्रापासून घाटमाथ्यावर ४००० फूट आहे व पायथ्यापासून ३००० फूट आहे; व याचें सर्वांत उंच शिखर ५६५३ फूट असून त्यास 'गुरु शिखर' असें ह्मणतात. या पहाडावर झाडी फारशी नाहीं. हल्लीं शिरोही दरबाराकडून ही झाडी वाढविण्याचे प्रयत्न सुरू आहेत. याच्या पायथ्यापासून घाटमाथ्यावर जाईपर्यंत सर्वत्र शून्याकार असून कोठेंही वस्ती आढळून येत नाहीं. ग्रीक लोकांच्या ग्रंथांतून या पर्वताचा उल्लेख असून महाभारतांतही याच्या उत्पत्तीची कथा दिली आहे. पुराणांतरीं या पर्वतास 'अर्बुध्' असें नांव आहे, व 'अर्बुधपुराण' नांवाच्या काव्यांत याचा इतिहास दिलेला आहे.

## पौराणिक.

अनादि कालापासून अर्बुध् पर्वतावर सुरलोकीं राहणारे दानव व यक्षकिन्नरादि वास्तव्य करीत, व

अचलेश्वरावरील सरोवरांत जलक्रीडा करीत, अशी कथा आहे. या पर्वतावर असणाऱ्या देवळांतील एका शिलालेखावरून अर्बुधाच्या उत्पत्तीबद्दल एक कथा आढळून येते. हिमालयावर वसिष्ठ मुनींनीं भगवान् शिवाची आराधना संपूर्ण केल्यानंतर असा वर मागितला कीं, या महानगाचा एक भाग आपण ज्या ठिकाणीं यानंतर राहणार आहों, त्या ठिकाणीं स्थापन करावा. शिवांनीं त्याप्रमाणें वरप्रदान केल्यानंतर, हिमालयाचा एक भाग हल्लीं ज्या ठिकाणीं अर्बुध् आहे, त्या ठिकाणीं स्थापित करण्यांत आला. या ठिकाणीं तत्पूर्वी सपाट प्रदेश होता. अर्बुधाच्या उत्पत्तीबद्दल दुसरी एक कथा ऐकण्यांत येते, ती अशी कीं,हल्लीं ज्या ठिकाणीं अर्बुध् आहे, तो प्रदेश मूळ अगदीं सपाटीचा असून त्या ठिकाणीं ऋषि व देव संचार करीत. ही पुण्यभूमि समजली जात असे. या प्रदेशावर एके ठिकाणीं एक अंत न लागणारी खोल बखळ पडली होती. वसिष्ठमुनींची नंदिनी नांवाची धेनु फिरत असतां यांत जाऊन पडली. वसिष्ठ मुनि चिंताक्रांत झाले. त्यांनीं सरस्वतीचें ध्यान केलें. सरस्वतीचा साक्षात्कार झाला; त्याबरोबर ती बखळ पाण्यानें भरून आली. नंदिनी तरंगून वर आली. असे प्रसंग

वरचेवर येऊं नयेत ह्मणून मुनींनीं कैलास पर्वतावर शिवाची आराधना केली. शिवांनीं हिमाचलाकडे जाण्यास मुनींस सांगितलें. हिमाचलानें वसिष्ठ मुनीचें ह्मणणें ऐकून आपल्या मुलांस, ही बखळ कोण भरून काढतो? असा प्रश्न केला. हिमाचलाचा सर्वांत धाकटा मुलगा नंदिवर्धन यानें हें काम करण्याचें पतकरलें. परंतु नंदिवर्धन हा पंगु असल्यानें तो ह्मणाला, माझा स्नेही अर्बुध नांवाचा सर्प आहे, त्यास तुह्मी मला तेथपर्यंत वाहून नेण्याची विनंती करा. अर्बुधाचें आर्जव केल्यानंतर तो कबूल झाला. त्यानें अशी अट घातली कीं, या बखळीवर जो पर्वत उभा राहील त्याचें नांव नंदिवर्धन न ठेवतां अर्बुध असें ठेवावें. वसिष्ठांनीं तें कबूल केलें. अर्बुधाच्या फणेवर बसून नंदिवर्धन त्या बखळीपर्यंत आला. त्या दोघांनीं बखळींत उडी टाकिली. ती बखळ इतकी खोल होती कीं, नंदिवर्धनाचें फक्त नाक दिसत होतें. त्या सर्पाच्या चळवळीनें नंदिवर्धन डुलूं लागला. वसिष्ठांनीं पुन्हा शिवाचा धांवा केला. शिवांनीं आपलें एक पाऊल नंदिवर्धनाच्या मस्तकावर ठेविलें, तेव्हां तो पर्वत हालेनासा झाला. अर्बुधावर अचलेश्वराचें जें देवालय आहे, तें याच कारणामुळें अस्तित्वांत आलें आहे.

अचलेश्वर या नांवाचें यथार्थत्वही या कथेवरून दिसत आहे. नंदिवर्धनानें ती बखळ भरून काढिली, व त्यास ठरल्याप्रमाणें अर्बुध ह्मणजे 'शहाण्याचा पर्वत' हें नांव प्राप्त झालें. तिसरी एक कथा अशी आहे कीं, अर्बुध हा पर्वत शंकराच्या नंदीच्या शृंगावर स्थापित केलेला आहे. जेव्हां या नंदीस कंटाळा येतो, तेव्हां तो एका शृंगावरून दुसऱ्या शृंगावर ठेवण्यांत येतो; या कारणामुळें या पर्वतावर जोराचे धक्के बसतात! अबूच्या पहाडावर जे धरणीकंप होतात ते याच कारणामुळें होतात अशी आख्यायिका आहे. अर्बुधाच्या एका शिखरावर अंबिकेचें स्थान आहे, यास 'अधरदेवी' असें ह्मणतात. व स्तुतः या देवीचें नांव अर्बुधमाता आहे, असें अर्बुधपुराणावरून दिसून येतें. हें स्थान बऱ्याच उंचीवर असून तेथपर्यंत चढून जाण्यास सुमारें साडेचारशें पायऱ्या चढावें लागतें. पर्वताच्या एका भागांत एक उंच गुहा असून, ही देवी पर्वतांतच खोदलेली आहे. ही अधान्तरीं लोंबत आहे असें तेथील पुजारी समजतात; व याच कारणानें तिला अधरदेवी असें ह्मणण्याचा परिपाठ आहे. गुहेजवळच देऊळ आहे, परंतु त्यांत मूर्ति वगैरे कांहीं नाहीं. व त्यावरील शिलालेखावरून तें वसंत

१६३२त (इ. स. १५७५) बांधलें, असें दिसून येतें. पूर्वी या ठिकाणीं अघोर जातीचे लोक राहत होते, त्यावरूनही या देवीचें नांव अघोरदेवी पडलें असावें, व त्याचा अपभ्रंश अधरदेवी असावा, असाही एका ग्रंथकाराचा अभिप्राय आहे.

अर्बुधावरील निरनिराळ्या धर्ममतांचें प्राबल्य तेथें असलेल्या जैन व हिंदु देवालयांवरून दिसून येतें. तेथील देवालयांतून शिलालेख आढळून येतात, त्यांवरून अर्बुधाचा इतिहास कळण्यास बरेंच साहाय्य झालें आहे. अगदीं जुना शिलालेख संवत् ७२७ (इ. स. ६७१) चा आहे. त्यावरून शैव मताच्या लोकांचें अर्बुधावर प्राबल्य होतें असें दिसून येतें. इ स.१३२० त जैन लोकांपैकीं विमलशहानें आपलें सुप्रसिद्ध देवालय तेथें स्थापन केलें. इ. स. १३२० पर्यंत जैन लोकांचें वर्चस्व अबूवर दिसून येतें. यानंतर पुनः शैव लोकांचा अबूवर अंमल दिसून येतो. १५ व्या शतकापासून इसवी सन १७५२ पर्यंत पुनः जैनधर्माचें प्राबल्य आढळून येतें, व पुनः शैवमतास प्राधान्य मिळालेलें दिसतें. व इ. स. १८२१ मध्यें शिरोहीचे राजे माधवसिंग यांनीं कांहीं हिंदु देवालयांचा जिर्णोद्धार केल्याचें शिलाले-

खांवरून उघड होत आहे. इ. स १८२२ त राजस्थानचे प्रसिद्ध इतिहासकार **कर्नल टॉड** हे अबूस प्रथमच गेले; व हेच तेथें गेलेले पहिले इंग्रज प्रवासी होत.

## ऐतिहासिक.

उपलब्ध माहितीवरून वेण राजाच्या वंशांतील **केयो** नांवाचा भिल्ल अर्बुधावर राज्य करीत होता. केयोचा मुलगा **आजानुबाहु** यानें कांहीं दिवस राज्य केलें. याच्याच वंशांतील शेवटला पुरुष **गूह** नांवाचा भिल्ल होता. व हाच गूह दाशरथी रामाचा मोठा भक्त असून त्यानें श्रीरामचंद्रास आपल्या नावेंतून गंगेच्या पार पोंचतें केलें. हा निषाद वंशांतील गूह या प्रांतांतील भिल्लांचा आदिपुरुष मानण्यांत येतो. अर्वाचीन इतिहासावरून अर्बुधावर परमार वंशांतील *राजे राज्य करीत असून, ते चंद्रावतीच्या राजाशीं अगदीं सन्निकट होते व गुजराथच्या महाराजांचे—ह्मणजे अनिलवाडापट्टणच्या राजघराण्याचे—मांडलिक होते.

---

* अबू व चंद्रावती हीं राजघराणीं ज्यांचीं मांडलिक होतीं त्या अनिलवाडापट्टणच्या महाराजांचा इतिहास पुढें लिहिल्याप्रमाणें आहे. हें घराणें चालुक्य वंशाचें होतें. **मूळराज** यानें इ. स. ९४२ पासून ९९६ पर्यंत राज्य केलें. **चामुंड** ९९६ पासून १०१०.

परमार वंशाची मूळपीठिका अशी आहे कीं, वसिष्ठ मुनींच्या यज्ञकुंडांतून एक मनुष्य उत्पन्न झाला. तो भगवान् मार्कंडेयाहून अत्यंत देदीप्यमान होता. वसिष्ठ मुनींना तो केवळ शत्रूचा नाश करण्याकरितां उत्पन्न झाला आहे असें माहित असल्यानें त्यास 'परमार' हें

---

पुढें **वल्लभ** ६ महिने होता. **दुर्लभ** इ. स. १०१० पासून इ. स. १०२२. हा जैन धर्माचा होता. **भीम**देव इ. स. १०२२ पासून १०६३. याचेच कारकीर्दीत अबूस **ध**नराज राज्य करीत होता. हा **भीम**देव **गु**जराथेंत राज्य करीत असतांना माळव्यामध्यें **धार** येथें **भो**जराजा गादीवर होता. अर्बुधाचा धनराज यानें अन्हिलवाडापट्टणच्या राजघराण्याचा पक्ष सोडून भोजराजाचा पक्ष धरिला. यामुळें **भीम**देवानें **वि**मलशहा यास आपले तर्फे अधिकारी ह्मणजे 'दंडपती' नेमून अबूस पाठविलें. याच वेळीं **विमल**शहानें **आ**दिनाथाचें देवालय बांधिलें. **भीम**देवानें **धार**वर स्वारी केली. याचेच कारकीर्दीत **ग**झनीचे महंमुदानें सोमनाथाचें देऊळ लुटिलें. भीमदेवानंतर **क**र्ण यानें गुजराथचें राज्य इ. स. १०६३ पासून १०९३ पर्यंत केलें. **ज**यसिंह किंवा **सि**द्धराज यानें १०९३ पासून ११४३ पर्यंत राज्य केलें. हा जयसिंह चालुक्य घराण्यांतील मोठा तेजस्वी व धुरंधर पुरुष होऊन गेला. यानंतर कुमारपाल यानें इ. स. ११४२ पासून इ. स. ११७३ पर्यंत राज्य केलें. यानें जैन पंथाचा हेमचंद्र याजकडून जैन धर्माची दीक्षा घेतली. याचेवेळीं **चं**द्रावती व **अ**बू येथें **य**शोधवल **प**रमार राज्य करीत होता.

नांव त्यांनीं दिलें. ('पर' ह्मणजे शत्रु आणि 'मार' ह्मणजे नाश करणारा.) यापासूनच परमार हें घराणें उत्पन्न झालें. परमार यासच अपभ्रंशानें 'पोनवार' व हल्लीं 'पोवार' असें ह्मणतात. अग्निकुंडांतून परमाराप्रमाणें आणखी तीन पुरुष उत्पन्न झाले होते, व या अग्निकुलोत्पन्न पुरुषांचीं ३५ घराणीं होतीं. एका कालीं या परमारांची इतकी प्रसिद्धि होती कीं, सर्व जग ह्मणजे परमारमय आहे, अशी ह्मण होती. परमार घराण्याच्या प्रमुख राजधान्या महेश्वर, धार, उज्जनी, चित्तोर, अबू, उमरकोट व पट्टण या ठिकाणीं होत्या. अर्बुधावरील सत्ता चंद्रावतीच्या राजघराण्यांतील धनराज, यशोधवल, कोटपाल, धारावर्ष, प्रल्हादन, सोमदेव व कृष्णदेव यांजकडे होती, असें शिलालेखांवरून दिसतें. धनराजाच्या कारकीर्दींतच

यानंतर **अ**जयपाल यानें ११७३ पासून इ. स. ११७६ पर्यंत राज्य केलें. दुसऱ्या **मू**ळराजानें ११७६ पासून ११७८ पर्यंत राज्य केलें. दुसऱ्या **भी**मदेवानें ११७८ पासून १२४१ पर्यंत राज्य केलें. याचे कारकीर्दींत **को**टपाल व **धा**रावर्ष अबूस राज्य करीत होते. **को**टपालास **सुलोच** व **इच्छिनीकुमारी** अशीं दोन अपत्यें होतीं. इच्छिनीकुमारी अत्यंत सुंदर होती. तिला **भी**मदेवानें मागणी घातली. **को**टपालानें तिला अजमीरचा चव्हाण राजा **वे**सुलदेव यास देण्याचें ठरविलें होतें. मग भीमदेवानें चतुरंग सेनेसह कोटपालावर स्वारी केली, व अबूगडास

विमलशहानें इ. स. १०३२ त अबूवरील आदिनाथाचें देवालय बांधिलें. कोटपाल व धारावर्ष यांचे कारकीर्दीत वस्तुपाल व तेजपाल यांनीं बांधिलेलें देवालय संपूर्ण झालें. चंद्रावतीच्या परमार घराण्याचा नाश नांदोलच्या चव्हाण घराण्यानें केला व या चव्हाणांपैकीं एका पुरुषानें सोमदेवाचा--जो आपल्यास 'महामंडलेश्वर' असें

वेढा दिला. कोटपाल पळून गेला. नंतर भीमदेवानें * शहाबुद्दिन घोरीशीं सामना केला. परंतु त्यांत त्याचा नाश झाला. यानंतर त्रिभुवनानें इ. स. १२४१ पासून १२४४ पर्यंत राज्य केलें. हाच चालुक्य घराण्यांतील शेवटचा पुरुष होता. यानंतर दुसऱ्या भीमदेवाच्या नोकरांपैकीं वीरधवल यानें **वा**घेला घराणें उदयास आणिलें. त्यांनीं गुजराथचें राज्य केलें व आपली राजधानी अन्हिलवाडापट्टणास न करितां **ढो**लका येथें केली. यापैकीं **वि**शालदेव, **अ**र्जुन व **सा**रंग या तिघांनीं राज्य केलें. व यांचेच कारकीर्दीत अबूवरील प्रसिद्ध देवालयांचे उत्पादक **व**स्तुपाल व **ते**जपाल यांचा पाडाव जाहला. वाघेला (व्याघ्रपल्ली) घराण्याचा शेवट कसा झाला हें इतिहासप्रसिद्धच आहे. यांतील अखेरचा पुरुष **करण** याचा वृत्तांत हल्लीं साद्यंत प्रसिद्ध झाला आहे.

* या भीमदेवाच्या कारकीर्दीच्या शेवटीं अबूस **धा**रावर्ष राज्य करीत होता. याचा भाऊ **प्र**ल्हादन असून त्यानेंच प्रल्हादनपट्टण किंवा पालनपूर हें स्थापन केलें. हे दोघे बंधु मुसलमानांच्या स्वारीच्या वेळेस गुजराथेच्या मार्गावर शिरोही प्रांतांत सैन्याचा तळ देऊन बसले होते.

ह्मणवून घेत असे त्याचा--पराजय करून इ. स. १२-१२ त अर्बुधावर आपलें वर्चस्व स्थापिलें. पुढें हल्लींच्या शिरोहीच्या रजपूत घराण्यांतील **रावरंभा** यानें इ. स. १२९६ मध्यें अर्बुध व १२०३ मध्यें चंद्रावती हीं दोन्ही ठिकाणें हस्तगत करून घेतलीं. याप्रमाणें परमार वंशाचा शेवट झाला. परमार वंशांतील पुरुषांचा माळव्यांतील **धार** येथील राजघराण्याशीं अगदीं निकट संबंध होता; व सामान्यपणें अशी एक ह्मण होती कीं,

‘ धार विन परमार नहि
‘ परमार विन नहि धार. ’

हल्लींचे **धार** घराण्यांतील पुरुष **पवार** या आडनांवाचे आहेत. परंतु ते दक्षिणेंतील मराठ्यांच्या वंशापैकीं आहेत. चंद्रावतीच्या राजघराण्यानंतर परमार वंशाचा बहुतेक लोपच झाला. शिरोहीच्या राजघराण्यानें इ. स. १२९६ मध्यें अबू हस्तगत करून घेतल्यापासून अद्यापपर्यंत तो पहाड त्यांचेच ताब्यांत आहे. अबूस शिरोही महाराजांचा एक महालकरी राहत असून त्याचा अधिकार या स्थलावर आहे. यात्रेकरितां जाणाऱ्या लोकांवर कर बसविला असून त्याचें उत्पन्न शिरोहीचे महाराज घेतात.

## जैनधर्म.

अबूचें जें महत्त्व आजकाल आहे, तें तेथील उभारलेल्या सर्वांगसुंदर व हृदयंगम अशा जैन मंदिरांमुळेंच होय. जैन धर्माचीं हल्लींच्या स्थितींत जीं संस्मरणीय स्मारकें दृष्टीस पडतात, त्यांपैकीं हीं जैन मंदिरें सर्वोत्कृष्ट आहेत. ज्या धर्मस्फूर्तीनें व सात्विक भक्तीनें तीं अस्तित्वांत आलीं, त्याबद्दल अत्यंत आदर वाटतो. जैन व त्याशीं पुष्कळ साम्य असलेला बुद्ध धर्म हे दोन्हीही हिंदुधर्मापासूनच उत्पन्न झाले आहेत, हें उघड आहे.* परंतु हिंदु व जैनधर्म यांमध्यें कांहीं महत्त्वाच्या बाबतींत फरक आहे. १ जैन लोक वेद प्रमाण मानीत नाहींत; २ 'अहिंसा परमो धर्मः' हें या जैनांचें मुख्य तत्त्व आहे; ३ जीव हा आद्यंतविरहित असून सूक्ष्म व चैतन्यमय आहे, व तो 'अणोरणीयान् महतो महीयान्' याप्रमाणें आहे. जीवाला सुखदुःखातीत स्थिति प्राप्त झाली ह्मणजे मोक्ष मिळतो. या धर्माचें लक्षण ह्मणजे त्यांत पूज्य मानिलेल्या चोवीस तीर्थंकरांचें अर्चन करणें व अहिंसा धर्मानें वागून आत्म्यास निर्वाणप्राप्ति करून देणे हें होय. जैन

* जैनधर्म हिंदूधर्मापासून निघाला नाहीं असें कांहीं जैन लोकांचें मत आहे.

लोकांच्या देवळांत या चोवीस तीर्थंकरांपैकीं कोणत्या तरी एका विशिष्ट तीर्थंकराच्या मूर्ति असतात. या प्रत्येक तीर्थंकराचें पृथक् चिन्ह आहे, व तें प्रत्येक मूर्तीच्या सिंहासनाखालीं दिसून येतें. हीं तीर्थंकरांचीं नांवें व चिन्हें खालीं लिहिल्याप्रमाणें आहेत:—

| नांव– | चिन्ह– |
| --- | --- |
| १ आदिनाथ किंवा ऋषभदेव, | नंदी. |
| २ अजितनाथ, | हत्ती. |
| ३ संभवनाथ, | घोडा. |
| ४ अभिनंदननाथ, | माकड. |
| ५ सुमतिनाथ, | चक्रवाक. |
| ६ सुपद्मनाथ, | कमळ. |
| ७ सुपार्श्वनाथ, | स्वस्तिक. |
| ८ चंद्रप्रभ, | चंद्राची कोर. |
| ९ पुष्पदंत, | नक्र. |
| १० शीतलनाथ, | कल्पवृक्ष. |
| ११ श्रेयान, | गेंडा. |
| १२ वासुपूज्य, | महिष. |
| १३ विमलनाथ, | वराह. |

| | |
|---|---|
| १४ अनंतनाथ, | शाळ. |
| १५ धर्मनाथ, | वज्र. |
| १६ शांतिनाथ, | हरिण. |
| १७ कुंथुनाथ, | बकरें. |
| १८ अरनाथ, | मासा. |
| १९ मल्लिनाथ, | कुंभ. |
| २० मुनिसुव्रत्त, | कांसव |
| २१ नामिनाथ, | कमळ. |
| २२ नेमिनाथ, | शंख. |
| २३ पार्श्वनाथ, | सर्प. |
| २४ **महावीर** अथवा **वर्धमान**, | सिंह. |

जैन लोकांत श्वेतांबर व दिगंबर असे दोन पंथ आहेत. श्वेतांबर पंथाच्या मूर्ति वस्त्राच्छादित असतात; व त्यांच्या नेत्रांत हिरे माणकें बसविलेलीं असतात. दिगंबर पंथाच्या मूर्ति वस्त्रहीन असतात, व त्यांच्या नेत्रांच्या ठिकाणीं रत्नें बसविलेलीं नसतात. अबूवरील जैन मंदिरांत असणाऱ्या बहुतेक मूर्ति श्वेतांबर जैन लोकांच्या आहेत. या तीर्थंकरांपैकीं अबूवरील जैन मंदिरें ज्यांच्या विशिष्ट नांवानें प्रसिद्ध आहेत, त्यांचें थोडेंसें वर्णन देणें अप्रस्तुत होणार नाहीं.

विमलशहानें बांधलेलें देऊळ **आदिनाथाचें** आहे. हा आदिनाथ पौराणिक कथेंत वर्णिलेला आहे. याच्या उत्पत्तीच्या वेळीं सहा महिने रत्नवृष्टि होत होती व त्याच्या मातेस गरोदर स्थितींत कल्पवृक्षाचीं फळें मिळत होतीं, अशी आख्यायिका आहे. या तीर्थंकरास कैलास पर्वतावर निर्वाण प्राप्त झालें.

**नेमिनाथ.**—याचें देऊळ वस्तुपाल व तेजपाल यांनीं बांधिलें आहे. याची कथा अशी आहे कीं, हा मथुरेच्या कृष्णाचा चुलतबंधु. त्यानें एकदां श्रीकृष्णाचा शंख उचलून स्वतः वाजविला व त्या योगानें सर्व तीन लोक हदरून गेले. तेव्हां कृष्णास ही हकिकत समजल्यावर त्यास त्याचे शक्तीबद्दल असूया वाटली व त्यानें नेमिनाथास लग्न करून घेण्याचा उपदेश केला. नेमिनाथास द्वारकेच्या उग्रसेन राजाची मुलगी **रा**जीमती देण्याचें ठरलें. लग्नाची सर्व तयारी झाल्यानंतर नेमिनाथ एके दिवशीं शहराचे बाहेर गेला. तेव्हां शेंकडो जनावरें म्लेच्छांस भक्षण करण्याकरितां आणलेलीं त्यानें पाहिलीं. नेमिनाथास हा प्रकार पाहून अत्यंत वाईट वाटलें व संसाराची असारता लक्षांत येऊन लग्न न करण्याचा त्यानें निश्चय केला. त्यानें संन्यासवृत्ति धारण केली. तो भिक्षु जाहला. गिरनार पर्वतावर त्यास

निर्वाण प्राप्त झालें. ज्या शिखरावर हें घडून आलें, त्या ठिकाणीं अद्याप नेमिनाथाच्या पादुका असून त्यांवर एक छत्री आहे. हल्लीं सुद्धां या टेकडीवरील एक गुहा राजीमतीची ह्मणून दाखविण्यांत येते. कारण राजीमतीनेंही नेमिनाथाच्याप्रमाणें सर्वसंगपरित्याग करून, भिक्षावृत्ति स्वीकारून, त्याचे सहवासांत आपलें आयुष्यक्रमण केलें.

**पार्श्वनाथ.**—बुद्धाप्रमाणेंच या तीर्थंकराची हकीकत आहे. शत्रुंजयमहात्म्यावरून असें दिसतें कीं, **शिवपुरी** येथें हा तपश्चर्या करीत असतांना, त्या तपश्चर्येचा भंग करण्याकरितां **कमठ** नांवाच्या दैत्यानें अतिशय पाऊस पाडला. त्या वेळीं धरणेंद्र नांवाच्या एका सर्पानें त्याचें रक्षण केलें, व **पद्मावती** नांवाच्या त्याच्या कुलदेवतेनें कमळाचें रूप धारण करून **पार्श्वनाथाचा** या संकटापासून बचाव केला. **शिवपुरीस** या कारणामुळें 'अहिछत्र' हें नांव प्राप्त झालें. हा तीर्थंकर वाराणशीजवळ जन्मला होता. आपल्या वयाचे तिसावे वर्षीं हा भिक्षुपद पावला. इसवी सनाच्या पूर्वी ७७७ वे वर्षीं त्याचा शेवट **शिखर** पर्वतावर झाला.त्यासच हल्लीं 'शिखरजी' किंवा 'पार्श्वनाथ' ह्मणतात, व हें स्थान बंगाल्यांत **हजारीबागे**जवळ आहे.

**महावीर** किंवा **वर्धमान.**–याचा जन्म चित्रकूट येथें झाला असून त्याचा वर्ण पीत होता. हा दिगंबर असून, मोठा श्रमण होता. इसवी सनाच्या पूर्वी पांचशें वर्षें याचा शेवट झाला. हा गौतम बुद्धाचा समकालीन होता. जैन लोकांचीं जीं प्रसिद्ध पुण्यतीर्थें आहेत, तीं याच तीर्थंकराच्या नांवानें निर्माण झालेलीं आहेत. बंगाल्यांत **शिखर**, गुजराथेंत **शत्रुंजय**, काठेवाडांत **गिरनार** व **अबू**, हिमालयांत **चंद्रराध**, हीं प्रसिद्ध जैन क्षेत्रें असून हजारों भाविक जैन यात्रेकरितां या क्षेत्रांस जातात.

## देउळवाडा उर्फ जैन मंदिरें.

अबूच्या पहाडावर **दिलवारा** या नांवानें जीं नामांकित देवालयें आहेत, तीं पांच आहेत. 'दिलवारा' हा शब्द 'देउळवाडा' या शब्दाचा अपभ्रंश आहे. देउळवाडा ह्मणजे देवळांचा समुच्चय. अशा तऱ्हेचे समुच्चय जैन लोकांच्या इतर क्षेत्रांत सुद्धां दिसून येतात. गिरनार पर्वतावर व पालिठाण्याजवळील शत्रुंजय टेकडीवर अशाच तऱ्हेचे देउळवाडे आहेत. या वाड्यांत असणारीं देवळें जैन धर्मांतील तीर्थंकरांच्या नांवानें स्थापन केलेलीं आहेत. अबूवरील देउळवाडा अथवा जैनमंदिरें केवळ संगमरवरी दगडांच्या खाणी आहेत. त्यांमध्यें प्राचीन आर्य

लोकांच्या शिल्पकलेचीं रत्नें भरलेलीं आहेत. हें शिल्पकलेचें रत्नभांडार पाहिलें ह्मणजे हिंदुस्थानांत एका कालीं ही कला किती पूर्णावस्थेस पोंचली होती हें स्पष्टपणें दिसून येणार आहे. या देवळांत पांढऱ्या संगमरवरी दगडांवर जे अनेक देखावे खोदले आहेत त्यांचें कौशल्य, व त्यांतील आकृतींत दिसून येणारें सौष्ठव व कोमलपणा, हीं पाहिल्यानंतर प्रेक्षकांचें मन आनंदमय होतें व यापासून उत्पन्न होणारी तल्लीनता प्राप्त झाली ह्मणजे '*A thing of beauty is a joy for ever*' या इंग्रजी ह्मणीचा प्रत्यय पदोपदीं येतो. या देउळवाड्यामधील प्रमुख देवालय विमलशहा यानें संवत् १०८८ ( इ. स. १०३२ ) यांत आदिनाथच्या नांवानें बांधिलें. या देवळासभोंवती मोठी तटाची भिंत आहे. देवळाच्या मुख्य दरवाज्यासमोर एक लहान इमारत असून तींमध्यें एक हत्तीखाना आहे. दरवाज्याच्या अगदीं सन्मुख या देवळाचा पुरस्कर्ता विमलशहा याचा एक घोड्यावर बसविलेला भव्य पुतळा आहे. या पुतळ्यावर एक छत्र आहे. या पुतळ्याच्या मागें एक लहान संगमरवरी दगडांचा त्रिकोणाकृति स्तंभ असून त्यावर जैन तीर्थंकरांच्या मूर्ति खोदलेल्या आहेत. या पुतळ्याच्या दोन्ही बाजूंस संगमरवरी दगडाच्या हत्तीच्या

दहा आकृति आहेत. या हत्तींवर पूर्वीं राउतांच्या आकृति असत असें सांगतात. विमलशहा पूर्वीं ज्यावेळीं आपल्या परिवारासह गजारूढ होऊन आदिनाथाच्या दर्शनास जात असे, त्या स्थितीचा दर्शक ह्मणून हा हत्तीखाना निर्माण केलेला आहे. देवळाचा दरवाजा उघडून आंत गेल्यानंतर आसमंतात् संगमरवरी दगडांचें नकशीचें काम व भव्य प्राकार पाहिला ह्मणजे चित्तवृत्ति स्तिमित होते, व आपण एखाद्या काल्पनिक सृष्टीमध्यें आहों कीं काय असा भास होतो. दरवाज्यासमोर एक दुघई सोपा आहे, तो मुख्य गाभाऱ्याच्या सभोंवतीं जो चौक आहे, त्याचा एक भाग आहे. या सोप्यांतून खालीं उतरल्या-नंतर एक संगमरवरी दगडांचा मंडप उभारलेला आहे. या मंडपासभोंवार आठ नकशीचे खांब असून चार कोंपऱ्यांस चार आधारस्तंभ आहेत. या सर्वांच्या योगें मंडपाचा आकार अष्टकोनाकृति झाला आहे. या खांबां-सभोंवार आणखी सुमारें ४० खांब असून त्यांनीं मंडप व सोपा यांच्या दरम्यान असलेला चौकाचा भाग जोडला आहे. मंडपाच्या वरचा भाग घुमटाच्या आका-राचा असून त्याच्या मध्यापासून संगमरवरी सर्वोत्कृष्ट दगडाचें तोरण खालीं लोंबत सोडिलेलें आहे. या मंड-पाच्या घुमटावर संगमरवरी दगड बसविले असून त्यांमध्यें

सोळा अप्सरांच्या आकृति मोठ्या मार्मिकतेनें खोदल्या आहेत. मंडपाचें सर्व काम संगमरवरी दगडाचें असून त्यांतील प्रत्येक खांबावर अवर्णनीय कुसर खोदलेली आहे. या मंडपांतील कमानीची रचना व घुमट हे अलीकडील पद्धतीहून अगदीं भिन्न प्रकारचे आहेत. हल्लींच्या इमारतींच्या कमानी अचकोनाच्या साहाय्यानें बांधल्या असतात. कमानीच्या वर्तुळाकृति भागावर दगड तिर्कस बसविले असून ते मध्यावरील दगडाच्या कैचींत असतात व कमानीवर पडणारें वजन या अचकोनांचे योगानें विभागलें जातें. अबूवरील कमानी या पद्धतीच्या नसून त्या समांतर रेषेंत दगड बसवून त्याच्या शेवटांनीं सांधलेल्या आहेत. या रचनेच्या पद्धतीमुळें घुमटाला विशेष बळकटी येऊन त्यापासून खालीं सोडलेलीं तोरणें विशेष खुलून दिसतात. अचकोनाच्या पद्धतीनें बांधलेल्या घुमटांत अशा तऱ्हेचीं तोरणें सोडावयाचीं झाल्यास त्याच्या आधारस्तंभाची बळकटी अधिकच ठेवावी लागेल. व याच कारणामुळें घुमटाव किंवा त्याच्या छतावर अनेक चित्रविचित्र आकृति बनविण्यांत आल्या आहेत. या मंडपांतून पुढें गेल्यानंतर एक शुभ्र लहानसें देवालय लागतें. या देवालयाच्या सभोंवती मोकळी जागा असून बाजूस संगमरवरी दगडांचा चौक आहे. व या देवळाचा

समोरील भाग ह्मणजे वर निर्दिष्ट केलेला दुघई सोपा होय. देवळाचा दरवाजा उघडल्यानंतर आंत अंधार असतो. प्रकाशाचे साहाय्यानें पाहिलें ह्मणजे गाभाऱ्यांत मोठ्या उंच सिंहासनावर आदिनाथाची प्रचंड मूर्ति बसविलेली दिसते. या मूर्तीचा वर्ण पिंवळा असून आदिनाथाचें चिन्ह वृषभ सिंहासनावर दिसून येतो. बुद्धाप्रमाणें आदिनाथाची मूर्ति समाधिस्थ आहे. या मूर्तीच्या डोळ्यांत रत्नें बसविलेलीं आहेत, व गळ्यांत देदीप्यमान रत्नांचा हार घातलेला आहे. ही मूर्ति पाहिली ह्मणजे बुद्धाचें वर्णन हुबेहुब नजरेपुढें उभें राहतें.

ततः स पर्यंकमकंप्यमुत्तमं बबंध सुप्तोरगभोगपिंडितम् ।
भिनद्मि तावद्भुवि नैतदासनं न यामि तावत्कृतकृत्य-
तामिति ॥ १ ॥ *

**अश्वघोष.**

आदिनाथाच्या देवालयासभोंवती असलेल्या चौकाची मजा फार अपूर्व आहे. या चौकांत देवळाच्या पाठभिंतीस लागून लहान लहान सुमारें बावन्न कमानी आहेत. त्यांमध्यें लहानशा सिंहासनावर अनेक तीर्थंकरांच्या मूर्ति

**अर्थः**—मग आसनमांडी घालून, निजलेला सर्प जशी आपली फणा ठेवतो तसा, तो आपल्या सर्व अंगाचा आकार करून अगदीं निश्चित बसला, आणि ह्मणाला कीं, मी कृतकृत्य होईपर्यंत हें आसन सोडून उठणार नाहीं.

बसविल्या आहेत व त्यांचीं चिन्हें सिंहासनावर खोदलीं आहेत. या कमानी व मूर्ति वगैरे सर्व काम संगमरवरी दगडाचेंच आहे. या कमानीचे पुढें सोप्याचे जे खांब आहेत त्यांजवर मौजेची कुसर काढलेली आहे. कमानीपुढील सोप्याचा जो कडीपाट आहे तो सर्व संगमरवरी दगडांचाच केलेला असून त्यांत अनेक तऱ्हेचीं चित्रें व पौराणिक कथाभाग खोदलेला आहे. कडीपाटाचा कांहीं भाग सपाटीचा व कांहीं ठिकाणीं घुमटाच्या आकृतीचा आहे. या संगमरवरी कडीपाटावर, कोठें लक्ष्मी हातामध्यें कमळ घेऊन गजशावकांच्या जोडीबरोबर क्रीडा करीत आहे, कोठें सरस्वतीची हृदयंगम आकृति खोदलेली आहे, कोठें नागकन्यांचा समुदाय आहे, कोठें नरसिंह अवताराचें प्रत्यक्ष वर्णन आहे, व कोठें भगवान् हिरण्यकश्यपूचा वध करीत आहेत, असा देखावा दिसत आहे. या चौकांतून इतस्ततः भ्रमण करतांना कडीपाटाकडे दृष्टि फेंकली तर अनेक चमत्कृतिजनक देखावे नजरेस पडतात. हिंदुधर्मांतील व जैनजातकांतील अनेक प्रसंगांचीं वर्णनें, तसेंच यक्ष-गंधर्व-किन्नरादि आकृति अगदीं हुबेहुब काढल्या आहेत. कित्येक ठिकाणीं मोठमोठीं कमळें विकास पावताहेत व त्यांचा मोठा गुच्छ बनला आहे, अशा

आकृति छतामध्यें काढिल्या आहेत. या अनुपम सौंदर्या-कडे पाहात असतांना नेत्रांचें पारणें फिटलें, असें मनास समाधान वाटतें; व कितीही सूक्ष्मपणानें, कितीही औत्सुक्यानें या सौंदर्याचें नेत्रांनीं आकलन करण्याचा प्रयत्न केला, तथापि पाहण्याची इच्छा अधिकाधिक वाढत जाते व उत्तररामचरितांत—

सततमपि ते स्वेच्छा-दृश्यो नवं नवमेव यः !

अंक ३, श्लोक २२.

या श्लोकांत वर्णन केलेल्या स्थितीचा प्रत्यय बरोबर मनास पटतो.

या चौकांतील एकंदर भागांत स्थापन केलेल्या उत्साहमूर्ति जैन तीर्थंकरांच्या आहेत. चौकाच्या एका टोंकास एका कमानींत अंबा-भवानीची मूर्ति आहे व हिला अंबा किंवा अंबाजी ह्मणण्याचा संप्रदाय आहे. या मूर्तीच्या साक्षात्कारानें विमलशहानें देऊळ बांधिलें, असें देवळांतील एका शिलालेखांत नमूद केलेलें आहे. या अंबिकेच्या मूर्तीजवळ एका कोंपऱ्यांत खोलीमध्यें भैरवाची भयंकर मूर्ति आहे. मूर्तीच्या हातांत एक शिरकमल असून त्यांतून रक्त वाहत आहे, असें दाखविलें आहे. अंबिकेच्या व भैरवाच्या मूर्तीवरून येथें प्रचलित असलेल्या एका आख्यायिकेचें यथार्थत्व लक्षांत येतें. ज्या

जागीं आदिनाथाचें देवालय बांधलेलें आहे, ती जागा शंकरास वाहिलेली होती. विमलशहास जेव्हां देंऊळ बांधण्यास अंबिकेचा साक्षात्कार झाला तेव्हां जागेची अडचण उत्पन्न झाली. विमलशहानें देवळास लागणाऱ्या सर्व जागेवर रुपये आंथरून ते या जागेच्या मालकास देण्याचें कबूल केल्यानंतर जागा मिळाली व देऊळ बांधण्यांत आलें. आदिनाथाच्या देवळाच्या मागें जीर्ण झालेलीं लहान हिंदु देवालयें अद्याप अस्तित्वांत आहेत. आदिनाथाच्या देवळाला लागून थोड्याच अंतरावर वस्तु पाल व तेजपाल यांनीं बांधिलेलें नेमीनाथाचें देवालय आहे. या देवळाची रचना बहुतेक आदिनाथाच्या देवळाप्रमाणेंच आहे. दोन्ही देवळें संगमरवरी दगडाचीं आहेत. आदिनाथाचें देऊळ व त्यांतील चौक रुंद असून प्रशस्त आहेत. नेमिनाथाचें देऊळ–विशेषतः त्याचा चौक–चिंचोळा व लांबट आकाराचा आहे. चौकाचे मध्यभागाचे ठिकाणीं खालीं मोकळ्या जागेंत आदिनाथाप्रमाणें नेमिनाथाचें लहानसें देवालय आहे. गाभाऱ्यामध्यें सिंहासनावर काळ्या रंगाची एक मूर्ति ध्यानस्थ बसली आहे. तिच्या डोळ्यांत रत्नें बसविलीं आहेत, व सिंहासनामध्यें तिर्थंकरांचें चिन्ह शंख खोदलेला आहे. नेमी-

नाथाच्या या मूर्तींच्या बाजूस दोन लहान सिंहासनांवर शांतिनाथाच्या मूर्ति बसविलेल्या आहेत. गाभाऱ्याच्या बाहेर आल्यानंतर दरवाज्याच्या तोंडाशीं दोन मूर्ति बसविल्या असून त्या देवराणी व जेठाणी या दोन द्वारपालिकांच्या आहेत. देवळाच्या पायऱ्या उतरतांना उजव्या बाजूस एक संगमरवरी शिळा असून त्यावर सुमारें एकुणसत्तर तीर्थंकरांच्या मूर्ति खोदलेल्या आहेत. यांतील पांसष्ट पांढऱ्या असून चार पिंवळ्या वर्णाच्या आहेत. देवळाच्या पुढें आदिनाथाच्या देवळाप्रमाणें संगमरवरी मंडप उभारला आहे. या मंडपाचे खांब विमलशहाच्या देवळापेक्षां उंच आहेत, व आकार आदिनाथाच्या देवळाप्रमाणें अष्टकोनाकृति आहे. याशिवाय चौक व मंडप यांस जोडणारे २६ खांब आहेत. त्यांवरील कुसर विशेष खुमारीची आहे. या मंडपाच्या घुमटांतून जो लंबक सोडला आहे, त्यावरील आकृति पाहिली ह्मणजे जणूं काय ईषदुन्मीलन पावणारा कमलगुच्छ विकास पावत आहे, असा भास होतो. या कमळाच्या पाकळ्या इतक्या कोमल–इतक्या हृदयंगम आहेत कीं जणूं काय तो सर्व गुच्छ दगडाचा नसून स्फटिकाचा बनविला आहे, अशी त्याची सौंदर्यप्रभा चमकत असते. मंडपाच्या खांबावर काढलेल्या आकृति फार प्रमाणबद्ध व सौंदर्यपूर्ण आहेत.

चौकामध्यें सुमारें एकुणचाळीस कमानी असून त्यांत निरनिराळ्या तीर्थंकरांच्या मूर्ति बसविल्या आहेत व चौकाच्या वरचा कडीपाटाचा भाग पौराणिक कथांतील चित्रविचित्र आकृतींनीं भरून टाकिला आहे. कोठें नेमीनाथाच्या लग्नसमारंभाची तयारी, कोठें युद्धाला सन्मुख राहिलेल्या चतुरंग सेनेचें चित्र, कोठें विजयश्री मिळवून परत येणारा छबिना, कोठें हा सभारंभ पाहणार नागरिक, व कोठें वातायनस्थ स्त्रीसमुदाय दृष्टीस पडतो. आदिनाथाच्या देवळाप्रमाणेंच येथें एका कमानींत देवीची मूर्ति असून तिला संकेसरी माता ह्मणतात. अंबिकेप्रमाणेंच हीही नेमीनाथाची सास्नादेवी आहे. नेमिनाथाच्या देवळाच्या मागील बाजूस हत्तीखाना आहे. त्यांत दहा हत्ती एका ओळीनें उभे आहेत. हे हत्ती, यांच्या सोंडी, यांच्यावर घातलेले अलंकार, झुला, गोंडे हे इतक्या बारकाईनें व खुबीनें खोदले आहेत कीं, त्यांचें मोठें कौतुक वाटतें. या हत्तींच्या पुढें एक संगमरवरी दगडांची जाळी आहे. हत्तींच्या मागें स्त्रीपुरुषांच्या आकृति आहेत. त्या वस्तुपाल व तेजपाल याच्या पत्नींच्या व त्यांच्या घराण्यांतील स्त्रीपुरुषांच्या आहेत, असें सांगतात. देवळांतील सर्व प्रेक्षणीय स्थळें पाहून मंडपांतून बाहेर पडतांना प्रेक्षकांचे पाय घुटमळूं लागतात. मंडपाच्या मध्यभागीं

शोभणारा मृणालाश्रित कमलगुच्छ, किंचित् उमलणारीं त्या सरोरुहांचीं दळें, त्यांचा सुकुमारपणा, त्यांतील मनोवेधक कौशल्य, या सर्व गोष्टी पाहून ही अकृत्रिम सुंदर घटना अस्तित्वांत आणणारे चतुर शिल्पकार, व त्यांच्या गुणांचा परिपोष करणारे उदारचरित पुरुष, यांच्याबद्दल धन्यतेचे उद्गार मुखावाटे येऊं लागतात. या महाभागांनीं आर्यावर्तांतील सुधारणेचें व कौशल्याचें येथें मूर्तिमंत व चिरंतन स्मारक निर्माण करून ठेविलें, याबद्दल साभिमान आनंद उत्पन्न होतो. जरी आमचे नेत्र अत्यंत कुतूहलानें या हृदंयगम कृतीचें आकर्षण करीत होते, तथापि प्रत्येक खेपेस नवी नवी मौज मनास वाटली, व'पुनः पुनर्यन्नवतामुपेति, तदेव रूपम् रमणीयतायाः ' या वाक्याचें रहस्य अंतःकरणांत बिंबलें. तेथून जातांना अशी कृति पुनः पाहावयास मिळणार नाहीं, या विचारानें आमचें मन खिन्न झालें.

## या देवालयांचे उत्पादक.

अशा तऱ्हेचीं मनोहर देवालयें उत्पन्न करणाऱ्या पुरुषाबद्दल कांहीं माहिती असणें आवश्यक आहे. आदिनाथाचें देवालय **विमलशहानें** बांधिलें, हें वर निर्दिष्ट केलें आहे. विमलशहा जातीचा भागवत किंवा पोरवाळ बानिया होता. अबूचा दंडपति असतांना यानें असंख्य

पैसे मिळविले अशी ख्याति आहे. विमलशहाचा गुरु वर्धमान सूरी या नांवाचा होता व आदिनाथाचें देवालय बांधतांना व संपूर्ण जाहल्यानंतर या गुरूच्या हस्तेंच या देवालयाचा संस्थापनविधि करण्यांत आला. **पट्टण** येथील जैन देवालयांतील एका प्रशस्तीवर हाच मजकूर नमूद आहे. हें देवालय इ. स. १०३२ त पुरें जाहलें. वस्तुपाल व तेजपाल हे दोघे पोरवाळ बनिया जातीचे होते. ह्यांची वंशावळ * खालीं दिल्याप्रमाणें आहे. हे दोघे बंधु मधुमाधवाप्रमाणें असून मोठे पराक्रमी होते. दुसऱ्या **भी**मदेवाचा मंत्री **च**हूडदेव यानें यांचा राजदरबारांत प्रवेश केला. वस्तुपालाची

* चंडप
|
चंद्रप्रसाद
|
सोम
|
अश्वराज=बायको कमलादेवी
|
लुंग, मल्लदेव, वस्तुपाल, तेजपाल

वस्तुपाल — जेत्रसिंह

तेजपाल — लावण्यसिंह

बायको ललिता देवी व तेजपालाची अनुपमा नांवाची होती. वीरधवलाच्या वेळेस या दोघांही बंधूंचें फार वजन होतें. यांनीं असंख्य देवालयें, स्तूप, तळीं बागा, कारंजीं व विहिरी खोदवल्या. त्याचप्रमाणें गिरनार पर्वतावर त्यांनीं नेमीनाथाचें देवालय बांधिलें. तें ललितादेवीच्या स्मारकाकरितां बांधिलें आहे. वस्तु-पाल व तेजपाल यांनीं बांधिलेल्या नेमीनाथाच्या देवा-लयाबद्दल बऱ्याच आख्यायिका प्रचलित आहेत. अनुपमा देवीला आपल्या अपार संपत्तीचें काय करावें अशी विवंचना पडली असतां, ती डोंगरावर ठेवावी ह्मणजे सर्वांस दिसेल, परंतु कोणी घेऊन जाणार नाहीं, असा तिला साक्षात्कार झाला; व त्यावरून हें देवालय अस्तित्वांत आलें असें ह्मणतात. दुसरी एक दंतकथा जैनप्रबंधांत अशी दिली आहे कीं, आपल्या हत्यारानें शिल्पकार जितकी दगडाची खोदून पूड काढील, तितके भार रुपये रोज मजुरी देऊन हें देवालय बांधिलें आहे. तिसऱ्या एका कथेवरून असें दिसतें कीं, थंडी-मुळें व दुष्काळामुळें पुष्कळ मजूर अबूवर हताश झाले होते. त्यांस मदत करण्याकरितां हें देवालय बांधलें. सारांश, हें देवालय बांधण्याच्या कामीं अनुपमा व लीलावती यांची धर्मबुद्धि पुष्कळ कारणीभूत झाली आहे,

असें दिसून येतें. निस्सीम धर्मबुद्धीशिवाय किंवा निष्काम भक्तीशिवाय अशा तऱ्हेचीं अलौकिक महत्कार्यें घडवून आणणें शक्य नाहीं. अबूसारख्या दुर्गम पायथ्यापासून तीन हजार फूट उंचीवर संगमरवरी दगडाचें अचाट मनोहर काम उठविणें हें असामान्य औदार्याचें दर्शक होय. अबूच्या पहाडांत संगमरवरी दगडांची खाण नाहीं. हा दगड अबूच्याखालीं सुमारें पंचवीस मैलांवरून जरीओच्या खाणींतून आणिला आहे. अंबाभवानीच्या डोंगराजवळ बखर प्रांतांत हा दगड मिळतो. परंतु हा कसा आणला, कोणत्या वाटेनें आणला, तो आणतांना काय श्रम पडले व किती पैसा खर्च झाला, याची कल्पना करणें अगदीं अशक्य आहे. अबूवर गाडी जाण्यास हल्लीं एकच मार्ग असून तोही अलीकडेच चांगला प्रशस्त केला आहे. यापूर्वी अबूवर चढण्याचा मार्ग अगदीं दुर्गम होता, वाटेंत झाडी पुष्कळ होती, अघोरीसारख्या क्रूर जातींचा संचार होता. या सर्व अडचणींतून या देवालयांची स्थापना ज्या पुरुषांनीं केली, त्यांचे ठिकाणीं दृढ निश्चय व स्थिर भक्ति असली पाहिजे, यांत संदेह नाहीं.

या मंदिराची व्यवस्था हल्लीं शिरोही दरबाराकडून होते. या देवालयाचें उत्पन्न सुमारें सहा हजार असून

खर्च सुमारें पांच हजार आहे. फाल्गुन वद्य ८ मीस मोठा उत्साह होतो. सुमारें पांचशें रुपये शिरोही दरबाराकडून खर्च होतात. देवालयांत नित्य तुपाचे नंदादीप, केशराची उटी, धूप, आणि धर्मगुरूंना नैवेद्य, अशी व्यवस्था आहे. यासाठीं पुजारी असून पहारेकरी असतात. दरबारचा एक मुनीम देखरेख करण्याकरितां येथें रहात असतो. या जैन मंदिरांत जातांना प्रवासी लोकांस आपलें पादत्राण काढून ठेवावें लागतें. परंतु अधिकारसंपन्न युरोपियन लोकांस ही अट नसून त्यांस नुसती टोपी काढण्याची विनंतीं करण्यांत येते. दरवाज्याच्या तोंडाजवळ एका पाटीवर खालील अक्षरें खोदलेलीं आहेत:—

As a mark of respect all Europeans to take off their hats on entering any part of the building in which it is customary for natives to go without shoes.

---

## इतर जैनमंदिरें.

वरील दोन देवालयांच्या जवळ एकाच आवारांत तिसरें जैन मंदिर आदिनाथ या तीर्थंकरास वाहिलेलें आहे. या देवळांत तीन लहान गाभारे असून त्यांत

पूर्वीं मूर्ति असाव्यात असें दिसतें. परंतु त्यांपैकीं एकाचा हल्लीं नुसता दरवाजा असून त्यांत मूर्ति दिसत नाहीं, व तो ईशान्येकडील कोंपऱ्यास आहे. या देवळांतील मुख्य गाभाऱ्यांत एक आदिनाथाची व दुसरी पार्श्वनाथाची अशा दोन मूर्ति आहेत. दुसऱ्या गाभाऱ्यांत तीन मूर्ति असून एक शांतिनाथ व दोन दुसऱ्या इतर तीर्थंकरांच्या आहेत. या दोन्ही गाभाऱ्यांपुढें मंडप असून त्यांतील कुसर सुंदर आहे. परंतु विमलशहा व वस्तुपाल यांच्या देवळांची तुलना करतांना या तिसऱ्या मंदिरांत प्रेक्षणीय असें कांहीं आढळून येत नाहीं. चौथें जैन मंदिर आवाराच्या बाहेर या तीन देवळांसच लागून आहे. हें देऊळ पार्श्वनाथ या तीर्थंकरास वाहिलें असून त्यास चौमूख ह्मणतात. याचें कारण या देवळास चार दरवाजे असून प्रत्येक दिशेस पार्श्वनाथाची मूर्ति बसविली आहे. या देवळाची आकृति भव्य आहे. यांतील फरसबंदी गालिच्याप्रमाणें चित्रविचित्र रंगाची असून मनोहर आहे. यांतील घुमट साधे परंतु डौलदार आहेत. पार्श्वनाथाच्या वर सिंहासनावर धरणिंद नांवाचा सर्प आपल्या अनेक फणा काढून या तीर्थंकरावर छत्राप्रमाणें धारण करीत आहे, असा देखावा दिसतो. या देवळांत बऱ्याच हिंदूंच्या मूर्ति कोरलेल्या दिसतात.

देउळवाडा किंवा ' दिलवारा ' ह्मणून जीं प्रसिद्ध देवळें आहेत, त्यांतील हीं चारच प्रमुख आहेत. हीं सर्व अबूपासून जो रस्ता अचलेश्वराकडे जातो त्याच्या एका बाजूस आहेत. रस्त्याच्या पलीकडे एक साधारण जैनमंदिर आहे. त्यांत पहाण्यासारखें कांहीं नाहीं. देउळवाड्याच्या मागें सपाट मैदान असून त्यावर ठिकठिकाणीं लहान लहान झुडपें आहेत. त्यांत कांहीं जीर्णावस्थेंत असलेलीं हिंदु देवालयें आहेत. याच्याच आसपास परमार जातीचे कांहीं लोकांची वस्ती असून आपल्या बायकामुलांसुद्धां ते येथें राहतात. या भागास ' बालंकृष्य ' किंवा ' वाल्मीक ऋषीचा आश्रम ' असें नांव आहे. याची अशी आख्यायिका आहे कीं, वाल्मीकि ऋषि त्या ठिकाणीं राहत असत. त्यांची इच्छा एका कुमारिकेवर गेली. तिच्या आईनें असा पण घातला कीं, सूर्यास्तापासून सूर्योदयाच्या आंत ऋषींनीं आपल्या तपोबलानें पहाडाच्या पायथ्यापर्यंत रस्ता केला, तर त्यांची इच्छा सफल होईल. ऋषींनीं रस्ता तयार करण्यास सुरवात केली; व तो पणाप्रमाणें पुरा होतोसा पाहून कुमारिकेच्या आईनें एका डोंगराच्या आड उभें राहून कोंबड्याप्रमाणें ओरडण्यास प्रारंभ केला. प्रभात

झाली, पण रस्ता शेवटास जात नाहीं, असें समजून खिन्न मुद्रेनें ऋषि परत येऊं लागले. मुनीस परत येतांना तें कपट कळलें. रागानें मुनीनें शाप दिला. कुमारिका व तिची आई पाषाणमय झाली. मुनीनें रागानें आईच्या पाषाणाचे तुकडे केले, व त्याजवर दगड रचले. कुमारिका शापानें नष्ट झाल्यामुळें मुनीस पश्चाताप झाला, व त्यांनीं तिला एका देवळांत स्थापन केली. या देवळास ' कन्वारि कन्या ' किंवा **कुमारी** असें नांव चालत आहे. येथें येणारे यात्रेकरू लोक या कुमारिकेचें दर्शन घेऊन तिच्या आईच्या मूर्तीवर दगड रचतात. या देवळाजवळ एक विष्णूचें जीर्ण देवालय आहे.

## अचलेश्वर आणि अचलगड.

देउळवाड्याच्या रस्त्यानें पुढें गेल्यावर डोंगराच्या एका भागास वळसा देऊन रस्ता बराच लांबपर्यंत जातो. वाटेंत बरेच ठिकाणीं वस्ती असून बरीच जमीन पेरलेली दिसते, व ठिकठिकाणीं विहिरी असून बागाईत केलेली आहे. अचलेश्वराच्या देवालयाजवळ एक लहान तलाव आहे. याचे तीरावर तीन लहान रेड्यांच्या मूर्ति असून त्यांचेजवळ एक संगमरवरी मूर्ति हातांत धनुष्य

घेतलेली उभी आहे. या तीन्ही रेड्यांच्या शरीरांत एकेक भोंक दिसून येतें. याची आख्यायिका अशी सांगतात कीं, या तलावास ' मंदाकिनी कुंड ' अशी संज्ञा होती व यांत पाण्याच्या ऐवजीं तूप भरलेलें असे. तीन दैत्य रेड्यांच्या रूपानें येऊन तें पिऊन जात. आदिपालानें आपल्या धनुष्यानें त्या तीन्ही रेड्यांचा नाश केला. त्याचाच पुतळा तीरावर आहे. एका शिलालेखावरून, धारावर्षानें हा पुतळा तेजसिंह याचे कारकीर्दींत संवत् १३४२ त उभारलेला आहे. या तळ्याच्या पलीकडील तीरावर एक जाड लोहदंड पडला असून यास ' भीमाची गदा ' असें ह्मणतात. या तळ्याच्या आसपास बरींच हिंदू–देवालयें आहेत. सुमारें तीन देवळें लक्ष्मीचीं आहेत. एक विष्णूचें आहे. एक त्रिमूर्तीचें आहे. एका ठिकाणीं शेषशाई विष्णूची मूर्ति असून समुद्रमंथनाचीं चित्रें काढिलेलीं आहेत. हीं देवळें विटांचीं असून तीं देऊळवाड्याच्या पूर्वींचींही असावींत असा समज आहे. तलावाच्या उत्तरेकडील बाजूस शिरोहीचा राव **मान**सिंग याचें देवालय आहे. या ठिकाणीं **मान**सिंग याचा अंत्यविधि जाहला असून त्याच्या स्मरणार्थ तें बांधिलें आहे. याशिवाय आसपास

बरींच देवालयें आहेत. परंतु महत्त्वाचें देवालय ह्मटलें ह्मणजे ' अचलेश्वर ' हें होय. हें स्थान शिवाचें असून यांतील शालुंका चौकोनी आहे व तिच्या मध्यावर एक भोंक आहे. त्याचे आंत शंकराची पिंडी आहे व पूजा करतांना त्या भोंकाचे आंत पाणी ओतण्याचा प्रघात आहे. याची आख्यायिका अशी सांगतात कीं, यांतील पाणी पाताळांत जातें व त्याचा अंत लागत नाहीं. धारावर्ष या परमारानें याची प्रतीति पाहण्याकरितां सतत सहा महिने या पिंडीवर अभिषेक चालविला, परंतु कांहीं उपयोग न होतां देवता क्रुद्ध होऊन परमार वंशाचा नाश झाला. देवाल्यासमोर एक पितळेचा भव्य नंदी आहे. ' संवत् १४६४ मध्यें रावळ यानें केला ' असा एक लेख याचे बैठकीवर कोरलेला आहे. या नंदीपुढें एक मूर्ति असून ती एका चारणाची आहे असें सांगतात. महंमदबेगरा यानें या नंदीचा नाश करावयाचा प्रयत्न केला होता, परंतु एकाएकीं पुष्कळ भुंगे उत्पन्न होऊन त्यांनीं त्याचा उच्छेद केला, अशी आख्यायिका आहे. अचलेश्वराचे देवालयांत बरेच शिलालेख असून त्यांवरून वस्तुपाल व तेजपाल यांचा भाऊ **मल्लदेव** यानेंही या देवालयाचा

जीर्णोद्धार करण्याचे कामीं पुष्कळ मदत केल्याचें दिसतें. देवालयापासूनच अचलगडाची चढण सुरू होते. अचलगड हा पूर्वी परमार घराण्याचा राहाण्याचा किल्ला असून याच ठिकाणीं अबूचे राजे राहत असत. वाटेंतून जातांना एक वेश लागते. त्यास 'हनुमान दरवाजा' ह्मणतात. त्यांतून पुढें गेल्यावर चंपा दरवाजा लागतो. या ठिकाणीं एक पार्श्वनाथाचें दुमजली देवालय आहे व हीं दोन्ही चौमुख आहेत. खालील चौकांत **कुंभराणा** याचा मुलगा व नातू **उदेसिंग** यांचे पुतळे इ० स० १५०९ मध्यें उभारलेले दिसतात. किल्ल्याचा वरचा भाग परमारांनीं बांधला असून कुंभराण्यानें त्यास बरीच भर घातली होती. या ठिकाणीं एक जुना तलाव आहे. किल्ल्याच्या बाजूस एक गुहा असून त्यांत एक साधु राहतात. तीस 'भर्तृहरीची गुहा' म्हणतात. किल्ल्यावरून पश्चिमेकडील दरवाजानें परत जातांना बऱ्याच ठिकाणीं दगडांवर शिलालेख असून, त्यांत 'धर्मार्थ दिलेल्या जमिनी, देवालयाकरितां दिलेली जागा, कोणी काढून घेऊं नये, घेईल त्यास शाप लागेल'—असें लिहिलें आहे.

## गुरुशिखर.

हें स्थान अबूच्या सर्वांत उंच टोंकावर असून समुद्राच्या सपाटीपासून याची उंची ५६०० फूट आहे.

देऊळवाड्याहून जो रस्ता येतो तोच उरीया नांवाच्या खेड्यावरून अचलेश्वराकडे जातो; व या खेड्यापासूनच गुरुशिखराकडे जाण्यास वाट फुटते. या उरिया गांवांत एक कनखलेश्वराचें देवालय आहे. त्यांत एक शिलालेख आहे. त्यावरून या देवळाचा जीर्णोद्धार अवंतीचा केदार राजे यानें संवत् १२६५ मध्यें केला असें दिसतें. त्यावेळेस धारावर्ष राज्य करीत होता. येथून पुढें गेल्यानंतर बऱ्याच कठिण मार्गानें गुरुशिखरावर जातां येतें. या स्थानावर उभें राहिल्यानंतर आसमंतांतील सृष्टिसौंदर्य, परमाराचा किल्ला व त्यांतील ओसाड भाग, खालीं दरीमधून दिसणारी वस्ती, देऊळवाड्याचीं शिखरें, सपाट मैदानें, निर्जन असे पर्वत, तुरळक झाडी व प्रशांत परिस्थिति हीं पाहिल्यानंतर मन स्तिमित होतें, व ज्या साधु पुरुषांच्या समागमानें हें स्थान पुण्यप्रद झालें आहे त्यांचे ठिकाणीं अंतःकरण भक्तिप्रवण होतें.

गुरुशिखरावर असलेल्या देवालयांत दत्तभृगु या साधूच्या पादुका आहेत, व वैष्णव मताचे प्रमुख रामानंद यांच्याही पादुका दाखविण्यांत येतात. या देवालयासमोर एक घंटा असून तिजवर–संवत १४६८–असें

कोरलें आहे. या स्थानाचे आसपास डोंगरांत गुहा असून या ठिकाणीं पुष्कळ साधु लोक तपश्चर्या करितात व राहातात.

या साधुपुरुषांच्या पर्णकुटिका पाहिल्यानंतर अनेक कल्पनातरंग मनांत उद्भवूं लागतात. तपश्चर्येला अनुकूल सर्व साधनें या ठिकाणीं एकवटलेलीं आहेत. अशा निर्जन ठिकाणीं येऊन समाधीच्या योगानें जीवन्मुक्त होण्याची जे पुरुष इच्छा बाळगतात त्यांस 'परोपकाराय सतां विभूतयः' या अनुभवाचा आस्वाद क्वचितच घेतां येईल. व सर्व उपाधींच्या मर्यादेबाहेर एकान्त स्थलीं येऊन उच्चतम स्वार्थ–म्हणजे मोक्ष–संपादन करण्याचा प्रयत्न करणाऱ्या पुरुषापेक्षां जगाच्या भवचक्रांत राहून अहर्निश परोपकारार्थ देह झिजविणाऱ्या विभूति निःसंशय ज्यास्त आदरास पात्र आहेत, असें वाटूं लागतें; व

शय्या शाद्वलमासनं शुचि शिला सद्मद्रुमाणामधः
शीतं निर्झरवारिपानमशनं कन्दाः सहाया मृगाः ।
इत्यप्रार्थित लभ्य सर्व विभवे दोषोऽयमेकोवने
दुष्प्रापार्थि नियत् परार्थ घटना वंध्ये वृथा स्थीयते ॥ ‡

या **नागानन्द** कवीच्या उद्गारांची सत्यता मनास पटते.

‡ या अरण्यांत निजायला गवताची मऊ जमीन आहे. बसावयाला चांगले दगड आहेत. झाडांच्या छायेखालीं गृह

## गौमुख.

अबूच्या पहाडावर अगदीं दुसऱ्या टोंकास गौमुख म्हणून दुसरें एक स्थान आहे. ही जागा खोलीमध्यें असून सुमारें पांचशें पायऱ्या खालीं उतरून जावें लागतें. डोंगरांतील पाणी एके ठिकाणीं करून एका गायमुखांतून कुंडांत सोडिलें आहे. या कुंडाचा जीर्णोद्धार शिरोहीचा राजा महादेवसिंह याचा मुलगा गुमानसिंह यानें संवत १८७५ त केला, असें नमूद आहे. या कुंडाजवळ वसिष्ठ मुनींचा आश्रम आहे. हें देऊळ संवत् १३९४ मध्यें चंद्रावतीच्या चव्हाण घराण्यांतील तेजसिंह यानें बांधिलें. देवळामध्यें काळ्या पाषाणाची एक वसिष्ठ मुनींची मूर्ति आहे. या वसिष्ठ मुनींच्या मूर्तीसमोर बाहेरील बाजूस एक लहानशी पितळेची मूर्ति आहे. ती परमार घराण्यांतील धारावर्ष याची आहे,

---

आहे. स्वच्छ झऱ्याचें पाणी प्यावयास मिळतें. कंदमुळें खावयास सांपडतात. हरिणाची सोबत आहे. अशी सर्व सामुग्री अनायासें, अयाचित या ठिकाणीं मिळत असूनही मला या वनांत एक दोष दिसतो. व तो हा कीं, या ठिकाणीं याचना करणारे पुरुष आढळून येत नाहींत व अशांस साहाय्य करण्याची संधि मिळत नाहीं. व यामुळें आमचें येथलि राहणें निष्फळ आहे.

अशी दंतकथा आहे. अचलेश्वराचा अंत पाहण्याचा जो प्रयत्न **धारावर्ष** यानें केला, त्याबद्दल झालेला कोप नाहींसा व्हावा अशी विनवणी मुनीस धारावर्ष करीत आहे, असें दाखविण्याकरितां हा पुतळा उभा केला आहे. या देवळाजवळच एक अग्निकुंड म्हणून जागा दाखविली जाते, व यांतूनच चार रजपूत अग्निकुलोत्पन्न घराणीं–परमार, चव्हाण, परिहार व चालुक्य अशीं–उत्पन्न झालीं. परशुरामानें निःक्षत्रिय पृथ्वी केल्यानंतर दैत्यांचा संहार करण्यास कोणीच उरला नाहीं व निर्वीर्य पृथ्वी केल्याची चूक देवांच्या लक्षांत आली-यज्ञयागाचें संरक्षण करण्याकरितां क्षत्रिय उत्पन्न करण्याची आवश्यकता वाटूं लागली. तेव्हां वसिष्ठमुनि व इतर सुरगण यांनी मोठा होम केला व त्या वेळीं या अग्निकुंडांतून वरील चार क्षत्रिय रजपुत कुलें उत्पन्न झालीं, असा कथाभाग आहे. या देवळाच्या आसपास पुष्कळ मूर्ति बसविल्या आहेत, व त्यांमध्यें वराह अवताराची एक मूर्ति आहे. गौमुखाच्या पूर्वेस व्यास ऋषीचें स्थान दाखविण्यांत येतें, व पश्चिमेस एक गौतम ऋषीचें देवालय आहे. गौमुखाच्या खालीं थोडया अंतरावर नागतीर्थ ह्मणून एक लहानसें तळें आहे.

या ठिकाणापासून आसपास पहाडाच्या दुर्गम भागांतून विविक्त अशा गुहांमधून साधुपुरुष तपश्चर्या करितात असें सांगतात. मनुष्याच्या वस्तीपासून हें स्थान अगदीं दूर आहे, व निरंजन अवस्था प्राप्त होण्याला ही परिस्थिति फार अनुकूल आहे. अशा प्रकारचीं स्थानें पाहिल्यानंतर शाकुंतलांत वर्णिलेले पुरुष पहावयास मिळण्याचा संभव पुष्कळ आहे.

वल्मीकार्ध–निमग्न मूर्तिसरसा सन्दष्ट सर्पत्वचा
कण्ठे जीर्णलताप्रतान वलये नात्यथ सम्पीडितः ।
अंसव्यापि शकुन्तनीडानीचितं विभ्रज्जटामण्डलं
यत्र स्थाणुरिवाचलो मुनिरसावभ्यर्क बिंबस्थितः ॥ १*

अंक ७, श्लोक १७५.

अबूवरील बहुतेक पुराणप्रसिद्ध स्थळांचा उल्लेख येथवर केला आहे. या शिवाय ‘ नक्की तलाव ’ म्हणून एक मोठा तलाव आहे. तो अबूवरील हल्लींच्या लोकवस्तीच्या जवळच आहे. हा तलाव बराच विस्तीर्ण असून

* हा मारीच ऋषि अर्धतनु वारुळांत बुडालेला, सापाची कांत उरावर असलेला, गळ्याभोंवती जीर्ण लतांचें कडें वाहणारा, जटाजूट मोठा वर्तुळाकार असून ज्याच्या खांद्यावर पसरला आहे, व ज्यांत पक्षी आपलीं घरटीं करून राहिलीं आहेत, असा एकाद्या खांबाप्रमाणें निश्चल असून सूर्यबिंबाकडे पहात उभा आहे.

त्याची लांबी १।२ मैल आहे व रुंदी पाव मैल आहे. याच्या सभोंवार वर्तुळाकृती रस्ता तयार केलेला आहे. तिरावर मोठमोठे वृक्ष असून झाडी दाट आहे. टेकड्यांवर बऱ्याच ठिकाणीं गुहा आहेत. या तलावासभोंवतीं सहल करतांना जलतरंगांवरून येणारा मंद व सुखकर वारा, सभोंवतालची वनश्री, पक्ष्यांचे कूजित, पुष्पांचा सुगंध व उदात्त सृष्टिवैभव या सर्वांच्या योगानें मनास फारच आल्हाद वाटतो.

अर्बुध पुराणामध्यें या तलावाबद्दल खालील कथा दिली आहे. भष्कली नांवाच्या एका राक्षसानें देवांच्या तपश्चर्येस फार अडचण केली. तेव्हां ब्रह्मदेवाकडे सर्व देव गेल्यानंतर त्यानें त्यांस अर्बुध पर्वतावर जाऊन तपश्चर्या करण्यास सांगितलें. याप्रमाणें देवगण अर्बुधावर आल्यानंतर, त्यांनीं आपलें दैत्यगणापासून संरक्षण होण्याकरितां, आपल्या हातांनीं खणून एक गुहा तयार केली. तीच गुहा हल्लींचें सरोवर आहे. यास पुराणांत 'देवखत' अशी संज्ञा आहे, व हातांनीं खणलें ह्मणून त्यास 'नखी तलाव' असेंही नांव आहे.

## हल्लींची वस्ती.

अबूवर अलीकडील वस्तीही बरीच आहे. शिरोही महाराजांचा येथें एक महालकरी राहात असून दिलवारा

येथील यात्रेकरूंवर जो कर बसवितात त्याचे उत्पन्नाची व्यवस्था व उरिया वगैरे जीं खेडीं पहाडावर आहेत त्यांतील उत्पन्नाची देखरेख हीं या अधिकाऱ्याकडून होतात याशिवाय कांहीं सरकारी नोकर, व्यापारी व थोडेसे रहिवाशी यांचीहीं वस्ती आहे व बाजारपेठ आहे. अबू हें हल्लीं राजपुतान्याच्या गव्हर्नर जनरलच्या एजंटचें ठाणें असल्यामुळें या ठिकाणीं राजपुतान्यांतील राजे लोकांनीं आपले बंगले बांधले आहेत व एजंटचा मुक्काम येथें असल्यामुळें पुष्कळ राजे लोक उन्हाळयांत हवा खाण्याकरितां येथें येतात, व त्यांच्या दरबारचे वकील येथें राहतात. याशिवाय अर्वाचीन सुधारणेचीं सर्व साधनें राज्यकर्त्यांच्या ऐषआरामाकरितां येथें उत्पन्न केलेलीं आहेत. म्युनिसिपालिटी, प्रशस्त रस्ते, व ठिकठिकाणीं कंदील दिसून येतात. युरोपियन लोकांचा जिमखाना, हाटेल, पोस्टाची जागा, शर्यतीचें मैदान, यामुळें या ठिकाणास शोभा आलेली आहे.

## अबूवर जाण्याची सोय.

स्टेशनावर उतरल्यानंतर, खरेडी ह्मणून स्टेशनावरील नोकरांच्या वस्तीचा भाग आहे. अबूवर टपाल पोंचविण्याकरितां व प्रवाशांस वाहनें पुरविण्याकरितां

एक मक्तेदार असतो, व त्याचेकडून टांगे वगैरे भाड्यानें मिळतात. अबूवर जाण्यास रस्ता उत्तम आहे, व त्याची लांबी १७ मैल आहे. टांग्यास माणशीं ४ रुपयेप्रमाणें १२ रुपये पडतात. याठिकाणीं एक घोडयाचें रेकल्यासारखें वाहनही मिळतें. त्यास माणशीं दोन रुपये पडतात. परंतु हें वाहन फार त्रासदायक व धोक्याचें आहे. अबूवर जाण्यास टांग्यास दोनपासून अडीच तास लागतात. पहाडावर गेल्यानंतर मक्तेदाराचें एक आफीस असून तेथें टांग्यांचा अड्डा आहे. अबूवर सर्वांत प्रेक्षणीय जीं जैनमंदिरें तीं या मक्तेदाराच्या ठिकाणापासून सुमारें १॥ मैल दूर आहेत. तेथपर्यंत जाण्यास बैलांच्या व घोडयांच्या गाडया मिळतात. देउळवाडा–किंवा दिलवारा--यामध्यें देवळाच्या बाहेरील बाजूस ओहऱ्या बांधल्या असून त्यांत प्रवासी लोकांस उतरतां येतें. भांडीं व थंडीकरितां रजया थोडयाशा खर्चानें वापरावयास मिळतात. या ओहरीजवळच एक वाण्याचें दुकान आहे, तेथें सर्व सामुग्री विकत मिळते. देउळवाडयाच्या मागील बाजूस परमार जातीच्या गरीब लोकांची वस्ती आहे. ते लोक कामाकाजास मजुरीनें येतात, व दहींदूध विकतात. देवळाजवळ विहिरी असून पाणी चांगलें

आहे. तसेंच देवळाजवळ एक मक्तेदार घोडीं बाळगितो, व तीं प्रवाशांस भाड्यानें देत असतो. अचलेश्वर, गौमुख, नखी तलाव, व पहाडावरील इतर प्रेक्षणीय स्थळांस जाण्यास व सहल करण्याकरितां या सोयीचा फार उपयोग होतो. मुंबईहून रात्रीचे गाडीनें निघालें असतां मनुष्य सकाळीं अमदाबादेस पोहोंचतो. तेथील पुराणप्रसिद्ध मुसलमानी मशिदी, झुलते मनोरे व इतर स्थळें पाहून रात्रीच्या १० चे गाडीनें गेलें असतां अबू-रोड स्टेशनावर सकाळीं उजाडतां गाडी जाते. मुंबई-हून दोन तीन मंडळींनीं अबूचा पहाड पहाण्याचें मनांत आणिल्यास थोड्या वेळांत सुमारें माणशीं वीस रुपयांचे खर्चांत हीं सहल करतां येते. परत येतांना सुरत व बडोदें हीं शहरें पाहण्यासारखीं आहेत.

वरील अप्रतिम देवालयांच्या वास्तव्यानें अबूचा पहाड अवश्य प्रेक्षणीय आहे, व ताजमहालाखालोखाल असलीं देवळें हिंदुस्थानांत कोठेंही नाहींत, असा अभिप्राय कर्नल टॉड यानें दिलेला आहे. आतां, अशा तऱ्हेची सर्वांग-सुंदर कृति नेहमींच्या स्थलापासून अगदीं निर्जन ठिकाणीं कां स्थापन केली आहे, हा प्रश्न प्रत्येक प्रेक्षकास स्वाभाविकपणें सुचतो. परंतु थोड्या विचारांतीं असें दिसून

येईल कीं, तपश्चर्येला किंवा समाधीला गिरिशिखर हें अत्यंत योग्य स्थान आपल्या लोकांत मानलेलें आहे; व याच कारणामुळें पुष्कळ नामांकित देवालयें पर्वताच्या शिखरावर बांधलेलीं आढळून येतात. अशाच स्थानामध्यें साधु, संन्यासी, ऋषि व महात्मे यांचें धाम असतें. गिरनार, शत्रुंजय, कैलास, बद्रिकाश्रम, रामगिरि, महाबळेश्वर या ठिकाणीं हीं स्थानें याच स्वरूपाचीं आहेत. गिरिशिखरावर वास्तव्य करण्याची हौस महाराष्ट्रांत तर प्राचीन आहे. छत्रपति शिवाजीमहाराजांनीं घाटमाथ्यावर सिंहगड, रायगड, प्रतापगड यांसारखे बांधिलेले किल्ले व सज्जनगडावरील **समर्थां**चा आश्रम हे पाहून महाराष्ट्रांतील प्रवाशास तरी अबूच्या देवालयाबद्दल कौतुक वाटतें. शिवाय अबूचा पहाड हवा खाण्याचें उत्तर हिंदुस्थानांतील मोठें ठिकाण आहे. मुंबई इलाख्यांत ज्याप्रमाणें खंडाळा, लोणावळें, माथेरान, पंचगणी, महाबळेश्वर हीं हवा खाण्याचीं ठिकाणें आहेत, त्याचप्रमाणें अबू हें राजपुतान्यांतील हवा खाण्याचें ठिकाण आहे.

## अबू व महाबळेश्वर.

महाबळेश्वर हें फेब्रुवारीपासून मेअखेर मुंबईच्या गव्हर्नराचें राजधानीचें ठिकाण असतें. अबूवर उन्हाळयाचे

दिवसांत गव्हर्नर जनरलच्या एजंटचें ठाणें असतें. समुद्रापासून महाबळेश्वराची उंची ४५४० फूट आहे; अबूवरील वस्तीची जागा ४००० फूट असून गुरुशिखरावर अबूची उंची ५६५३ फूट आहे. समुद्र किनाऱ्यापासून महाबळेश्वर ४० मैल लांबीवर आहे. समुद्रापासून अबू सुमारें २९० मैल अंतरावर, व खंबायताचे आखातापासून १६० मैल अंतरावर आहे. महाबळेश्वरावर पाऊस अतोनात पडतो; सुमारें २६० इंच पासून २७५ इंच पाऊस पडतो. यामुळें तेथें पावसाळ्यांत राहतां येत नाहीं.अबूवर पाऊस सरासरी ६८ इंच पडतो व तेथें या ऋतूंत राहतां येतें. पावसाळ्यांत दोन्ही ठिकाणीं प्रेक्षणीय सृष्टिसौंदर्य दिसून येतें. परंतु महाबळेश्वरावरील देखावा अधिक बहारीचा असतो. अक्टोबरपासून जानेवारीपर्यंत महाबळेश्वरावर थंडी बेताची असल्यामुळें राहण्यास मौज वाटते. अबूवर अक्टोबरपासून उन्हामुळें दूषित ताप उत्पन्न होऊन हवा बरोबर असत नाहीं. जानेवारी महिन्यांत थंडी अतोनात पडते. त्यावेळीं तेथें राहणें सुखावह नसतें. महाबळेश्वरावर पुष्कळ बंगले बांधले असून प्रवाशास राहण्याची फार चांगली सोय आहे. अबूवर प्रवाशांकरितां भाड्यानें देण्यासारखे फारसे

बंगले नाहींत. महाबळेश्वरावर पाण्याची सोय अबूपेक्षां चांगली आहे. उन्हाळ्यामध्यें महाबळेश्वरावर समुद्राकडील आल्हादकारक गार वारा एकसारखा वाहतो व हवेंत थंडावा असतो. अबूवर राहण्याची जागा खोलांत असून सर्व बाजूंनीं उंच पर्वताच्या टेंकड्या असल्यामुळें उन्हाळ्यांत हवेंत गारवा नसून उष्मा फार होतो. या दिवसांत महाबळेश्वरावर फळफळावळ भाजीपाला उत्तम मिळून, लिंगमाला धोबीतलाव इत्यादि ठिकाणाची मौज व ब्रह्मारण्याकडील सृष्टिसौंदर्य यांचा अनुभव घेतां येतो. अबूस या प्रकारचीं ऐषआरामाचीं साधनें नसून तेथें उन्हाळ्याच्या दिवसांत मनाला विश्राम वाटत नाहीं. अबूवर नैसर्गिक उत्पन्न होणारीं फळें ह्मणजे आंवळे, आंबे, द्राक्षें वगैरे पुष्कळ मिळतात. परंतु महाबळेश्वराप्रमाणें भाजीपाला, बटाटे, वटाणा वगैरे पिकवून तेथें तयार करीत नाहींत. महाबळेश्वरापेक्षां अबू हें जरी दुय्यम प्रतीचें ठिकाण आहे तरी राजपुतान्यांतील गरम व रेतीच्या प्रदेशांत हें ठिकाण या ऋतूंत पुष्कळच सुखकारक असतें.

## उपसंहार.

पौराणिक व ऐतहासिक दृष्टीनें हें स्थळ अगदीं प्रेक्षणीय आहे व केवळ करमणुकीकरितांसुद्धां या

ठिकाणीं एकवार गेलें असतां ' नयन विषयम् जन्मन्येकः सएव महोत्सवः ' असा अनुभव येतो. ताजमहालाखालोखाल शिल्पकलेचें दुसरें उत्कृष्ट उदाहरण हिंदुस्थानांत याशिवाय कोठेंही आढळून येत नाहीं. हीं सर्वांगसुंदर देवळें अस्तित्वांत आल्यानंतर मुसलमानांच्या रियासतींत अल्लाउद्दीन वगैरेनीं यांतील बऱ्याच भागाचा व कोरीव नकशीचा मूर्ख धर्मवेडामुळें भंग केलेला आहे. जैन लोकांमध्यें आपल्या धर्माबद्दल व थोर पूर्वजांच्या या अप्रातिम स्मारकाबद्दल अलीकडे पुष्कळ कळकळ उत्पन्न जहाली असून या देवालयांची सुस्थिति करण्याकडे त्यांचें लक्ष गेलेलें दिसतें. नुकत्याच भरलेल्या जैनपरिषदेनेंही या बाबतींत आपलें मत वरीलप्रमाणेंच प्रदर्शित केलें आहे. धर्मश्रद्धा व संपत्ति जैन लोकांत विपुल असल्यामुळें ते लोक आपल्या पूर्वजांनीं बांधलेलीं देवालयें उज्ज्वल ठेवतील अशीं चिन्हें दिसत आहेत. प्राचीन इमारतींच्या संरक्षणाशिवाय या देवळांचा दुसऱ्या एका दृष्टीनें उपयोग होणार आहे. शिल्पकलेच्या परमावधि नैपुण्याची हीं देवळें साक्ष देत आहेत. अशी कृति उत्पन्न करणारे कारागीर ज्या देशांत एका काळीं राहात होते तो देश भरभराटींत होता हें निर्विवाद आहे. युरो-

पियन लोकांनीं सुद्धां या देवालयांची फारच तारीफ केली आहे, असें कर्नल टॉडच्या आरंभीं दिलेल्या अभिप्रायावरून दिसून येईल. अशा प्रकारचें शिल्पकलेचें ज्ञान मिळविण्याचीं साधनें हल्लीं उपलब्ध नाहींत. उत्तेजनाच्या किंवा आश्रयाच्या अभावामुळें पूर्वींचे कारागीर नष्ट झाले. मुंबईंत असलेल्या ‘ आर्ट स्कूल ’ मध्यें अशा प्रकारचें शिल्पज्ञान, घडींव व कोरींव काम शिकवण्याचा कांहींसा प्रयत्न चालू आहे. तेव्हां अशा वेळीं सरकारानें व लोकांनीं कांहीं विद्यार्थ्यांस हीं मंदिरें पाहण्यास पाठवून किंवा तेथील उत्कृष्ट कृतींचे नमुने आणवून विद्यार्थ्यांस शिकविण्याचा प्रयत्न जाहल्यास या कलेचें पुनरुज्जीवन होईल. **सर जॉर्ज बर्डवुड** यांनीं एके* ठिकाणीं हेंच

---

* All that is needed to prevent their decay or degeneracy from false imitation is enlightened patronage of genuine examples of Indian art by the public in private buildings as well as by the Government and Municipalities in different parts of India, in works of local as well as general public utility

मत नमूद केलें आहे. देशाच्या अनेक बाबतींतील सुधारणांकडे विचारी लोकांचें लक्ष हल्लीं लागलें आहे; व जो उत्साह हल्लीं पाळण्यांत येतो, त्यावरून ललित कलेच्या या एका प्रमुख अंगाची वाढ लवकरच होईल अशी बळकट आशा आहे.

ग. र. अभ्यंकर.




टीपः—स्थलवर्णनात्मक हा निबंध मूळ विविधज्ञानविस्ताराच्या ३८व्या पुस्तकांत प्रसिद्ध झाला.तो अबूचा प्रवास करणारांस उपयुक्त वाटेल ह्मणून स्वतंत्र पुस्तकरूपानें आह्मीं प्रसिद्ध करीत आहों.

नवीनच जोडलेल्या अबूच्या नकाशामुळें देवळें पाहण्याचें काम सुलभ जाईल.

प्रकाशक.

# जाहिरात.

खालील पुस्तकें मुंबई शाळाखात्याचे डायरेक्टर–ऑफ–पब्लिक इन्स्ट्रक्शन यांनीं बक्षिसांसाठीं आणि शाळालैब्रऱ्यांसाठीं मंजुर केलीं आहेत.

रु० आ०

गीतार्थसार. (कै० वामन आबाजी मोडक, बी. ए.) ०—४
धौमसहाबळेश्वर वर्णन. (कै० यशवंतराव आनंदराव उदास, बी. ए.) ... ... ... ... ...०—८
भ्रांतिकृत चमत्कार. (कै० श्रीराम भिकाजी जठार, बी. ए. आणि बजाबा रामचंद्र प्रधान.)... ...०—६
बालशिक्षण. (गणेश जनार्दन आगाशे, बी. ए.) ०—३
सुंदरेची संक्रांत. (गणेश जनार्दन आगाशे, बी. ए.) ०–१॥
व्हिक्टोरिया महाराणीचें चरित्र. (कै० गणेश भिकाजी गुंजीकर, बी. ए.) ...०—३
दानत. " " " " ...०–१॥
स्वपराक्रम. " " " " ...०—४
कुटुंबवत्सल. " " " " ...०—२
ब्रिटिशराज्यव्यवस्था. (शिवराम सि. वागळे, एल् एल् बी.) ०–८
बेकनचे निबंध. " " " .. ०–१२
सिसरोकृत नीतिविषयक चार निबंध. ... ०—४
स्वतःचाऽयत्न. (विष्णु मोरेश्वर महाजनि, एम्. ए.) ०—३
कुसुमांजलि. " " " " ... ०—४
अभिनवकादंबरी. (गंगाधर रामचंद्र मोगरे.) ... ०—४
पद्यात्मक लघु हितोपदेश. ... ... ... ०—४
श्रीशिवछत्रपतींचें चरित्र. ... ... ... ... १—०
सार्वजनिक आरोग्य. (डॉ. सर भालचंद्र कृ. भाटवडेकर) ०–१२
मोचनगड. (रामचंद्र भिकाजी गुंजीकर.)... ...०–१०